**नोंदणी व मुद्रांक विभागाच्या रेडी रेकनरमधील मार्गदर्शक सूचना विचारात न घेता केवळ वार्षिक बाजारमूल्य दरानुसार मोबदल्याच्या रकमेची परिगणना करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन शुद्धिपत्रक क्र.-संकीर्ण-०३/२०१८/प्र.क्र.४३/अ-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दि. ११ सप्टेंबर, २०१८.

वाचा:- शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-०३/२०१८/प्र.क्र.४३/अ-२, दि.१३ ऑगस्ट, २०१८

**प्रस्तावना :-**

नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग प्रकल्पाच्या आखणीतील ७०५२.७८ हे.आर. खाजगी जमिनीपैकी ५८९९.६२ हे.आर (८३.६५%) खाजगी जमीन अद्यापपावेतो खरेदी करण्यात आली आहे. त्यापोटी २१७१६ भूधारकांना ५७४५.७८ कोटी इतका मोबदला वाटप करण्यात आलेला आहे. तसेच महाराष्ट्र महामार्ग अधिनियमानुसार उर्वरित खाजगी जमीन संपादनाची कार्यवाही प्रगतीपथावर आहे.

नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग प्रकल्पाच्या आखणीतील ८३% खाजगी जमीन खरेदी करण्यात आली असून आता फक्त सुमारे १७% खाजगी जमीन ताब्यात घेण्याची प्रक्रिया बाकी आहे. नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्गासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्या. ही अंमलबजावणी यंत्रणा आहे. सदर मार्गासाठी यापूर्वी देण्यात आलेला दर व यापूढे द्यावयाचा दर या दर निश्चितीमध्ये समानता राहणे आवश्यक आहे. त्यामुळे संदर्भाधिन शासन परिपत्रकाच्या अनुषंगाने निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार शासन सर्वकष विचार करून पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन शुद्धिपत्रक :-**

नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग प्रकल्पाच्या भूसंपादन प्रक्रियेस शासन परिपत्रक दि.१३.८.२०१८ मधील नमुद तरतूद लागू राहणार नाही.

सदर शासन शुद्धिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०९१११५५४५६९६१९ असा आहे. सदर शुद्धिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash K Gawade

Digitally signed by Subhash K Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40b8b2876e2135f5b158b877f59754b2a7ddf64e0cf59f2dc33ad60b8bce5bcd, cn=Subhash K Gawade
Date: 2018.09.11 15:58:53 +05'30'

**( सुभाष कि. गावडे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अ.मु.स., मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (वित्त व वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
८) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९) अ.मु.स. (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
१६) सर्व विभागीय आयुक्त
१७) सर्व जिल्हाधिकारी
१८) संचालक, नगर रचना, पुणे
१९) निवडनस्ती (अ-२).